**विमुक्तजाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभागाच्या आश्रमशाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांविरुध्द लाचलुचपत प्रकरणी कार्यवाही करण्याकरीता प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण यांना प्राधिकार प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्तजाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : विभशा-२०१८/प्र.क्र.१४० /विजाभज-२**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**विस्तारभवन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ११ जून, २०१८.**

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुर्नबांधीत/११अे, दि.१२/०२/२०१३

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसीबी-२०१५/प्र.क्र.९६/टीएनटी-४, दि.५/११/२०१५.

३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसीबी-२०१५/प्र.क्र.९६/टीएनटी-४, दि.१४/७/२०१६.

४) शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसीबी-२०१५/ प्र.क्र.९६/ टीएनटी- ४, दि.१/१/२०१७.

<u>प्रस्तावना :-</u>

शासकीय कर्मचाऱ्याविरुध्द लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून लाचेच्या यशस्वी सापळ्यामध्ये अभियोग पूर्व मंजूरी देण्यासाठी संबंधीत नियुक्ती प्राधिकारी हे सक्षम प्राधिकारी आहेत. शासन मान्यताप्राप्त खाजगी अनुदानीत स्वयंसेवी संस्थांच्या आश्रमशाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांचेविरुध्द दुर्वतन, गैरवर्तन, गैरकारभार, नैतिक अध:पतन झाल्याचे आढळून आल्यास शासन मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित संस्थांच्या आश्रमशाळेतील कर्मचाऱ्याविरुध्द महाराष्ट्र खाजगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील नियम २८ ते ३९ नुसार "नियुक्ती प्राधिकारी" म्हणून शिस्तभंगाची कार्यवाही करण्याचे अधिकार हे संबंधीत संस्था/शाळा व्यवस्थापनास आहेत. लाचलुचपत प्रकरणांमध्ये अभियोग दाखल पूर्व मंजूरी देण्याची कार्यवाही संबंधीत संस्थांकडून होत नसल्याने परिणामस्वरुप अशी प्रकरणे प्रलंबित राहात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. शासन मान्यताप्राप्त खाजगी अनुदानीत आश्रमशाळामधील एखाद्या कर्मचाऱ्यास निलंबित करावयाचे झाल्यास उक्त नियमांतर्गत नियम ३३ नुसार व्यवस्थापनाने संबंधित सहायक आयुक्त, समाज कल्याण किंवा प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांची परवानगी घेउन लाचलुचपत प्रकरणाबाबत संबंधीत संस्थेने आवश्यक कार्यवाही करणे आवश्यक आहे.

३. त्यामुळे स्वयंसेवी संस्थांच्या आश्रमशाळेत कार्यरत असलेल्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या संदर्भात लाचलुचपत प्रतिबंध प्रकरणी अभियोग दाखलपूर्व मंजूरी देण्याकरीता महाराष्ट्र खाजगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) अधिनियम १९७७ मधील कलम ४ मधील पोटकलम ४-अ नुसार शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यास प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण

विभाग हे सक्षम असल्याने त्यांना याबाबत आवश्यक ते प्राधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विमुक्तजाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभागाच्या शासन मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित आश्रमशाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांचे लाचलुचपत प्रकरणी, लाचलुचपत प्रतिबंध कायदा, १९८८ मधील कलम १९ प्रमाणे लागणारी अभियोग पूर्व मंजूरी संबंधित संस्थेने देणे आवश्यक आहे. महाराष्ट्र खाजगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) अधिनियम, १९७७ मधील कलम ४ मधील पोटकलम ४-अ च्या तरतुदीनुसार स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या शासन मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित आश्रमशाळांतील संबंधीत दोषी कर्मचाऱ्यांविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही केल्यानंतर सेवेतून निलंबीत करणे अथवा काढून टाकण्यासंदर्भात सबंधीत प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग हे सक्षम प्राधिकारी असून त्यांचा निर्णय हा शाळा संबंधित आश्रमशाळा व्यवस्थापनास तसेच संबंधीत कर्मचाऱ्याला बंधनकारक आहे.

२. विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांमधील प्रकरणपरत्वे शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे बाबतीत, संबंधीत प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांना लाचलुचपत प्रतिबंधक प्रकरणी अभियोग दाखल पूर्व मंजूरी देण्यासाठी या आदेशाद्वारे सक्षम प्राधिकारी म्हणून शासन प्राधिकृत करीत आहे. लाचलुचपत प्रतिबंधक कार्यालयाकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यावर संबंधित सहायक आयुक्त समाज कल्याण विभाग यांनी प्राथमिक चौकशी करुन अभियोगपूर्व मंजूरीची पुढील कार्यवाही विहित मुदतीत म्हणजेच ९० दिवसांचे आत करावी. संबंधीत प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण यांना प्राथमिक चौकशीची कार्यवाही करणे शक्य नसल्यास त्यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या लगतच्या कनिष्ठ अधिकाऱ्याकडून कार्यवाही पूर्ण करुन घ्यावी.

३. लाचलुचपत प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यास मंजूरी देण्यासाठी प्राप्त होणाऱ्या प्रकरणांमध्ये अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबद्दलचे सर्वंकष आदेश तथा सूचना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यांचेदेखील काटेकोरपणे अनुपालन करण्याची दक्षता सक्षम प्राधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०६१११७१६१३६७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.06.11 17:18:19 +05'30'

( भा. र. गावित )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१. मा.राज्यपालाचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
५. सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे स्वीय सहाय्यक.
६. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे
७. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, (सर्व)
१२.सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, (सर्व)
१३.जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४.मुख्याध्यापक, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा .............
१५. निवड नस्ती (विजाभज-२)